शहर टाकळी व इतर २४ गावे, ता.शेवगाव जि. अहमदनगर येथील प्रादेशिक नळपाणी पुरवठा योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु २०१३/प्र .क्र.११२/पा.पु.०९**
**मंत्रालय ,मुंबई ४०००३२**
**दिनांक - १५ सप्टेंबर,२०१५**

**वाचा:-**

१) शासन पत्र क्रमांकः बैठक११०५/ प्र.क्र.१५७/ पा.पु.०६ दि. २२ मार्च,२००६
२) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, अहमदनगर यांचे पत्र क्र. तांशा २/७९४/सन २०१० दि.१२/३/२०१०
३) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, समक्रमांक दि. १४.११.२०१४
४) सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचे पत्र क्र मजीप्रा/सस/तांशा-२/सीआर १२९३/१३५ दि. ९.२.२०१५

**प्रस्तावना:-**

शहर टाकळी व इतर २४ गावे ता.शेवगाव जि. अहमदनगर येथील प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. २४८३.९३ लाख किंमतीच्या सुधारित योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला होता. त्या अनुषंगाने प्रस्ताव नियोजन व वित्त विभागास सादर केला असता वित्त विभागाने work contract tax व ऑफीस खर्चासाठी केलेली तरतूद वगळून येणा-या वाढीव किंमतीवर ९ % ETP Charges आकारून रु. ४०५.८७ लाख या वाढीव खर्चासह रु. २१३०.२४ लाख इतक्या सुधारित किंमतीस मान्यता प्रदान केली होती. त्यानुसार संदर्भाधीन क्र ३ चे शासन निर्णयान्वये रु. २१३०.२४ लाख इतक्या सुधारित किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. तथापि, सदर किंमतीत योजनेतील उर्वरित सर्व कामे पूर्ण करणे शक्य नसल्याने रु. २४१६.२७ लाख इतक्या किंमतीस सुधारित प्रशासकीय मान्यता देणेबाबत संदर्भ क्र ४ चे पत्रान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने केलेल्या विनंती नुसार रु. २४१६.२७ लाख इतक्या सुधारित किंमतीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

वरील बाब विचारात घेऊन शहर टाकळी व इतर २४ गावांची प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजना ता. शेवगाव जि. अहमदनगर या पाणी पुरवठा योजनेच्या रु. २४१६.२७ लाख किंमतीच्या सुधारित योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत वित्त विभागास प्रस्ताविण्यात आले होते. मात्र वित्त विभागाने,सुधारित अंदाजपत्रक रु. २४८३.९३ लाख इतक्या किंमतीमधून work contract tax ची तरतूद रु. ३९.०० लाख व कार्यालयीन खर्चाची तरतूद रु. २८.६६ लाख अशी एकूण रु.६७.६६ लाख व त्यावरील ई.टी.पी चार्जेस रु. ६.१० लाख असे एकूण ७३.७६ लाख तरतूद वगळून रु. २४१०.१७ लक्ष इतक्या सुधारित किंमतीस मान्यता प्रदान केलेली आहे. त्यानुसार शहर टाकळी व इतर २४ गावे

प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. २४१०.१७/-लाख (रुपये चौवीस कोटी दहा लाख सतरा हजार फक्त)इतक्या सुधारित किंमतीस पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) ही योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत कार्यान्वित करण्यात येईल.

२) या योजनेच्या मूळ प्रशासकीय मंजुरी दिलेल्या निर्णयातील सूचना व तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच मूळ शासन निर्णयात ज्या अटी व शर्ती दिल्या आहेत त्या कायम राहणार असून त्याचेही पालन करण्यांत यावे.

३) योजनेचा वार्षिक देखभालीचा खर्च रु. ९१,६९,६३०/- असून वार्षिक उत्पन्न रु. ९०,७२,९००/- इतके आहे. त्यामुळे योजना आर्थिक द्ष्टया सक्षम असल्याचे दिसून येत नाही. त्यामुळे योजना सक्षम होण्याच्या दृष्टीने पाणीपटटीमध्ये आवश्यक ती सुधारणा करण्यात यावी.

४) सदर योजना पुनर्सुधारित केली जाणार नाही व सुधारित प्रशासकीय मान्यता मिळाल्यानंतर ६ महिन्यात हातगाव योजनेसह शहरटाकळी योजनेची उर्वरित कामे पूर्ण करण्यात यावीत.

५) सदर योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधीत ग्रामपंचायत/ जिल्हा परिषदेच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधीत कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना विभाग यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यासंबंधी संबंधीत ग्रामपंचायत / जिल्हापरिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हापरिषद व संबधित ग्रामपंचायतीच्या अधिका-यांनी संयुक्तपणे पहाणी आयोजित करावी आणि अशा पहाणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

६) योजनेची चाचणी घेतल्यानंतर योजना संबंधित ग्रामपंचायती/जिल्हा परिषदेकडे हस्तांतरित करून तिचे लेखे बंद करण्यात यावे.

७) सदर योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) यावर दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी किंवा योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नूतनीकरण करण्यासाठी संबंधित जिल्हा परिषदेस किंवा ग्रामपंचायतीस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी नियम, १९६० मधील तरतुदींनुसार आकारण्यात येणा-या पाणीपट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी ठरेल हे पाहण्याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायतीची / जिल्हा परिषदेची राहील. सदर योजना आर्थिकदृष्टया सक्षम राहण्यासाठी पाणीपटटी दरामध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी वाढ करण्यात यावी.त्या अनुषंगाने या योजनेकरीता पाणीपटटी ग्रामपंचायत आकारेल. ग्रामपंचायतीने तशा आशयाचा ठराव केल्याशिवाय योजनेची उर्वरित कामे हाती घेवू नयेत.

८) यानंतर योजना पुनर्सुधारित करण्यात येणार नाही याची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची राहिल.

९) या योजनेवर होणारा खर्च राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाअंतर्गत उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्र.३३१/का१४४३ दि. २४.१२.२०१३ व ३९४/व्यय ३ दि. २७.८.२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१५१५५८०९९३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vaishali Dattatraya Fulsundar

Digitally signed by Vaishali Dattatraya Fulsundar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=035ad3ac42b3cb2d7153eb07ca4987f4c28aa8b52bad8a330512fc5df5d5b426, cn=Vaishali Dattatraya Fulsundar
Date: 2015.09.15 16:00:41 +05'30'

**वै. द. फुलसुंदर**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक.
२) जिल्हाधिकारी, अहमदनगर
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
५) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना, नाशिक
६) वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई.
७) महालेखापाल,( लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/ मुंबई .
८) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (संकल्पचित्र व नियोजन विभाग,) नवी मुंबई.
९) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना मंडळ, अहमदनगर
१०) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना विभाग, अहमदनगर
११) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, अहमदनगर
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर.
१३) सर्व विधानमंडळ सदस्य.
१४) वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६) मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, यांचे स्वीय सहाय्यक पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
१७) कार्यासन क्रमांक पापु-०४,०६,१०,१३,१७,१८, २० व संगणक कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,
१८) निवडनस्ती कार्यासन पापु-०९